**शासकीय निवासस्थाने**
**दक्षता पथकाची स्थापना**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-शानिवा-३०/२००१/१४४४/
प्र.क्र.२७५/२००१/२३अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- १९ मे, २००१

**शासन निर्णय :-**

बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानांच्या गैरवापराबाबत येणा-या तक्रारींची प्रत्यक्ष जागेवर जाऊन शहानिशा करण्यासाठी विभागांतर्गत कोणतीही यंत्रणा सध्या अस्तित्वात नाही. शासकीय निवासस्थानांच्या गैरवापरावर नियंत्रण ठेवण्यासाठी व अशा तक्रारीबाबत गुप्तता पाळून तातडीने कार्यवाही करण्यासाठी विभागांतर्गत एक दक्षता पथक स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. शासकीय निवासस्थानाच्या गैरवापरांचे गांभीर्य लक्षात घेऊन शासकीय निवासव्यवस्थेचे काम पाहणा-या प्रभारी अवर सचिवांच्या नियंत्रणाखाली एक दक्षता पथक स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या दक्षता पथकात खालील अधिकारी/कर्मचारी यांचा समावेश राहिल :-

| | |
|---|---|
| १) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/२३-अ | दक्षता पथक प्रमुख |
| २) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग/२३-अ | सदस्य |
| ३) दोन सहाय्यक, सामान्य प्रशासन विभाग/२३-अ | सदस्य |
| ४) सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयातील निरीक्षक | सदस्य |
| ५) नियंत्रक, निवासव्यवस्था यांच्या कार्यालयातील दोन निरीक्षक | सदस्य |
| ६) नियंत्रक, शिधावाटप यांच्या कार्यालयातील दोन निरीक्षक | सदस्य |

**दक्षता पथकाला पुढीलप्रमाणे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत :-**

१) बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानाच्या गैरवापरावर लक्ष ठेवणे
२) निवासस्थानाच्या गैरवापराबाबत येणा-या तक्रारींची प्रत्यक्ष जागेवर जाऊन शहानिशा करणे
३) निवासस्थानांचा गैरवापर झाला आहे असे तपासणीमध्ये सिध्द झाल्यास त्या संबंधीचा तपासणी अहवाल तयार करुन संबंधितांविरुध्द निष्कासन कार्यवाहीचे आदेश योग्य त्या यंत्रणेला देणे
४) निवासस्थानाचा गैरवापर करणा-या अधिकारी कर्मचा-यांविरुध्द नियमानुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्याची शिफारस संबंधित कार्यालयाला/विभागाला करणे व त्याबाबतचा पाठपुरावा करणे
५) निवासस्थानाची तपासणी करण्याकरिता कार्यालयीन वेळेनंतर किंवा सुट्टीच्या दिवशी अथवा आवश्यक वाटल्यास रात्री-अपरात्री निवासस्थानाला भेट देण्याचे व चौकशी करण्याचे अधिकारी दक्षता पथकाला रहातील

कृ.मा.प.

६) निवासस्थानाच्या तपासणीच्या वेळी काही गैरप्रकार घडू नये म्हणून नजीकच्या पोलीस ठाण्याकडून पुरेसे पोलीस संरक्षण घेण्याचे अधिकार दक्षता पथकाला राहतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

**( दे.त्र्यं.कुमावत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख (संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावे)
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा),मुंबई,(पत्राने)
प्रबंधक ,उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,(पत्राने)
सचिव,महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
दक्षता पथकातील सर्व अधिकारी/कर्मचारी,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई (संबंधीत पोलीस ठाण्याला उचित सूचना देण्यात याव्यात)
निवड नस्ती